कोल्हापूर मध्यवर्ती कारागृहाच्या बांधकामासाठी वाढीव अनुदानास प्रशासकीय मंजुरी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन निर्णय क्र. बीएलडी २००४/प्र.क्र.४८/पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-३२, दि.२५ मे, २००४

वाचा :- १) कारागृह उप महानिरिक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.बीएलडी/कोमका/२६१२/कक्ष-३, दि. १२.३.२००१
२) शासन निर्णय गृह विभाग क्र. ओएमपी ०१९२/२(२११)/पीआरएस-२, दि. २.११.१९९३

**शासन निर्णय** :- कोल्हापूर येथे नविन मध्यवर्ती कारागृह बांधण्यासाठी उपरोक्त संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये रु. ३५०/- लाख इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता दिली असून कारागृहाचे बांधकाम सुरु आहे. सदर खर्चामध्ये आतापर्यंत ८ बरॅकी, १० सेल्स, उपहारगृह, अंतर्गत रस्ते इ. चे बांधकाम पूर्ण झाले असून सदर बांधकामावर रु. ३५६/- लाख इतका खर्च झालेला आहे. याव्यतिरिक्त दवाखाना विभाग, स्वयंपाकगृह, महिला विभाग, रस्त्यांचे विद्युतीकरण, खेळाचे मैदान, पिण्याच्या पाण्याची सोय जमिन सुधारणा इ. विषयक बांधकामे बाकी आहेत. त्याकरीता रु. २४३.०८/- लाख इतक्या अधिक अनुदानाची आवश्यकता आहे. म्हणजे सदर प्रकल्पासाठी एकूण रु. ३५०/- लाखाऐवजी ५९९.५२/- लाख इतक्या सुधारील खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती उक्त संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये कारागृह महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केली आहे.

२. सदर प्रस्तावास पूर्वी दिलेल्या रु. ३५०/- लाखाच्या खर्चाच्या मंजुरीमध्ये उपरोक्त पूर्ण झालेली व शिल्लक असलेल्या सर्व कामांचा समावेश होता. परंतु सदर शासन मान्यता तत्कालीन दरसूचीवर आधारीत किंमतीची परिगणना करुन तयार केलेल्या अंदाजपत्रकानुसार मंजुरी देण्यात आली होती. तथापि पूर्वीच्या आराखड्यामध्ये आताच्या दरवाढीमुळे प्रत्येक बाबीवर झालेली वाढ लक्षात घेता अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर यांनी सादर केलेल्या सुधारीत अंदाजपत्रकानुसार सदर प्रकल्पास पूर्वीच्या रुपये ३५०/- लाख खर्चाऐवजी रु. ५९९.९२ लाख इतका खर्च अपेक्षित आहे. कोल्हापूर येथे नवीन मध्यवर्ती कारागृह बांधण्याच्या कामाचा समावेश केंद्रपुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेच्या सन २००२-२००३ ते सन २००५-०७ च्या आराखड्यात केलेला असून या योजनेसाठी मागणी क्र. बी-५ मुख्यलेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०१८९)" या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पात तरतूद केलेली आहे. तसेच सदर प्रकल्पाचे काम प्रगतीपथावर असल्याने होणाऱ्या वाढीव खर्चास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली असून वित्त विभागानेही मान्यता दिलेली आहे.

३. उपरोक्त वस्तुस्थितीत कारागृहाची सुरक्षितता, कामाची निकड व तातडी, बंद्याच्या सोयीसुविधेत व सुरक्षिततेत होणारी वाढ लक्षात घेता, तसेच कोल्हापूर येथे नवीन मध्यवर्ती कारागृह तातडीने सुरु करण्याच्या दृष्टीने कोल्हापूर मध्यवर्ती कारागृहाच्या बांधकामासाठी पूर्वी दिलेल्या रु. ३५०/- लाख खर्चाच्या मंजुरीमध्ये वाढ करुन आता रुपये ५,९९,५२,०००/- (रुपये पाच कोटी नव्याण्णव लाख बावन्न हजार फक्त) इतक्या वाढीव खर्चास शासन या आदेशानुसार प्रशासकीय मंजुरी देत आहे.

४. यासाठी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, मुख्य लेखाशीर्ष "२०५६, तुरुंग, १०१-तुरुंग, (००) (०९) कारागृह सुधारणा योजना (केंद्रपुरस्कृत) (योजनेतर) (२०५६-०१८९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून, मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व खर्चाची माहिती विहित विवरणपत्रात केंद्रशासनास पाठविण्यासाठी शासनास सादर करावी.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. सीआर ३९५/२००४/व्यय-८, दि. १३.५.२००४ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(स्वाक्षरी)

(र. ना. माळी)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन, गृह विभाग

प्रत,

- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे.
- कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे.
- अधिक्षक, कोल्हापूर मध्यवर्ती कारागृह, कोल्हापूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर.
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा) मुंबई / नागपूर.
- जिल्हा कोषागार अधिकारी, कोल्हापूर
- अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, कोल्हापूर
- कार्यकारी अभियंता, राष्ट्रीय महामार्ग विभाग क्र. ८६, कोल्हापूर
- उप विभागीय अभियंता (वर्ग-१), राष्ट्रीय महामार्ग विभाग क्र. ७, कोल्हापूर
- सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई-३२.
- वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (पीपुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- अवर सचिव (पीआरएस-३), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
- निवड नस्ती, पीआरएस-२, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.